**चंद्रपूर जिल्हयातील चिमूर व नागभिड तालुक्यांत स्वतंत्र नवीन अप्पर तहसिल कार्यालय स्थापन करण्यास मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक प्राफेब २०१५/ प्र.क्र.७१/ म-१०**
मंत्रालय, पहिला माळा, मुख्य इमारत,हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा रोड,
मुंबई- ४०००३२.
दिनांक: **१० ऑगस्ट, २०१७**

वाचा:- विभागीय आयुक्त, नागपूर यांचे पत्र क्र.मशा/कार्या-७(३)/सीआर६८/१४/कावि- १३५/१६, दि.१९.०३.२०१५

**प्रस्तावना:-**

चंद्रपूर जिल्ह्यातील चिमुर व नागभिड तालुक्यांची वाढणारी लोकसंख्या, मोठे क्षेत्रफळ, झालेले नागरीकरण, आदिवासी क्षेत्र इ. बाबींमुळे सध्याच्या चिमुर व नागभिड तालुक्यातील तहसील कार्यालयावर कामकाजाचा मोठा ताण पडत असल्यामुळे प्रशासकीय सोयीच्या दृष्टीने चिमुर व नागभिड तालुक्यात अनुक्रमे भिसी व तळोधी बाळापूर येथे प्रत्येकी १ याप्रमाणे २ स्वतंत्र अप्पर तहसिलदार कार्यालय स्थापन करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

चंद्रपूर जिल्हयातील चिमूर तालुक्यातील भिसी व नागभिड तालुक्यातील तळोधी बाळापूर येथे स्वतंत्र अप्पर तहसिलदार कार्यालय स्थापन करण्यास व त्याअनुषंगाने पुढील प्रमाणे पद मंजूरीस व अन्य अनुषंगिक बाबींस या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे :-

१) विद्यमान चंद्रपूर जिल्हयातील चिमूर व नागभिड तहसिल कार्यालय बळकट करण्याच्या दृष्टीने अनुक्रमे अप्पर तहसिलदार भिसी व तळोधी बाळापूर यांच्या नवीन कार्यालयासाठी खालील ४ पदे नियमित वेतनश्रेणीवर मंजूर करण्यास शासन मान्यता देत आहे. तसेच सदर पदे ही सध्याच्या त्या- त्या संवर्गाचा एक भाग राहतील.

| अ.क्र. | पदाचे नाव | वेतनश्रेणी (रु.) | अप्पर तहसिलदार कार्यालयाचे नाव व पदसंख्या | | एकूण |
|---|---|---|---|---|---|
| | | | भिसी ता. चिमूर जि. चंद्रपूर | तळोधी बा. ता. नागभिड जि. चंद्रपूर | |
| १ | अप्पर तहसिलदार | १५६००-३९१००, ग्रेड पे-५०००/- | १ | १ | २ |
| २ | लिपिक-टंकलेखक | ५२००-२०२०० ग्रेड पे-१९००/- | १ | १ | २ |

२) सदर नवीन दोन्ही कार्यालयासाठी आवश्यक असणारी नायब तहसिलदार प्रत्येकी १ याप्रमाणे दोन पदे, अव्वल कारकून प्रत्येकी १ याप्रमाणे दोन पदे व लिपिक- टंकलेखक प्रत्येकी ३ याप्रमाणे सहा पदे अशी एकूण १० पदे विभागीय आयुक्त,नागपूर यांनी संबंधित जिल्ह्यातील तहसिलदार कार्यालयात कार्यरत असलेल्या पदांपैकी नव्याने स्थापन करावयाच्या अप्पर तहसिलदार कार्यालयांसाठी स्थलांतरणाने उपलब्ध करुन देण्याची कार्यवाही करावी व नवीन कार्यालये तातडीने कार्यान्वित करावित.

३) चंद्रपूर जिल्हयातील तहसिलदार कार्यालय चिमूर व नागभिड तसेच या दोन तालुक्यात अनुक्रमे अप्पर तहसिलदार कार्यालय भिसी व तळोधी बाळापूर यांचे कार्यक्षेत्रात खालीलप्रमाणे महसूली मंडळे व गावे राहतील:-

| अ. क्र. | कार्यालयाचे नाव | महसुल मंडळे | महसुली गावे |
|---|---|---|---|
| १ | तहसिलदार, चिमुर<br>जि. चंद्रपूर | एकुण मंडळे - ४<br>खडसंगी (३७ गावे), चिमुर (३३ गावे),<br>नेरी (२७ गावे), मासळ बु. (४५ गावे) | १४२ |
| २ | अप्पर तहसिलदार, भिसी,<br>ता. चिमूर, जि. चंद्रपूर | एकुण मंडळे - ३<br>भिसी (३९ गावे), जांभुळघाट (३४ गावे),<br>शंकरपूर (४४ गावे) | ११७ |
| ३ | तहसिलदार, नागभिड<br>जि. चंद्रपूर | एकूण मंडळे - ०२<br>नागभिड (२७ गावे), मेंढा किरमीटी (२९ गावे) | ५६ |
| ४ | अप्पर तहसिलदार, तळोधी बाळापूर ता. नागभिड,<br>जि. चंद्रपूर | एकूण मंडळे - ०२<br>तळोदी बा. (३४ गावे), मिंडाळा (४८ गावे) | ८२ |

४) चंद्रपूर जिल्हयातील तहसिलदार, चिमूर व तहसिलदार, नागभिड तसेच अप्पर तहसिलदार, भिसी,ता. चिमूर,जि. चंद्रपूर व अप्पर तहसिलदार तळोधी बाळापूर ता. नागभिड जि. चंद्रपूर यांच्या कार्यक्षेत्रातील महसूल मंडळांतर्गत तलाठी साझे व त्यामध्ये अंतर्भूत होणा-या गावांची यादी प्रसिद्ध करण्याबाबतची कार्यवाही जिल्हाधिकारी, चंद्रपूर यांचे स्तरावर करण्यात यावी.

५) अप्पर तहसिलदार, भिसी, ता. चिमूर जि. चंद्रपूर व अप्पर तहसिलदार, तळोधी बाळापूर, ता. नागभिड जि. चंद्रपूर यांचे प्रतिवेदन अधिकारी अनुक्रमे उपविभागीय अधिकारी, चिमूर व ब्रम्हपूरी हे राहतील आणि त्यांचे नियंत्रक अधिकारी म्हणून जिल्हाधिकारी, चंद्रपूर हे काम पाहतील.

६) अप्पर तहसिलदार, भिसी ता. चिमूर जि. चंद्रपूर व अप्पर तहसिलदार तळोधी बाळापूर ता. नागभिड जि. चंद्रपूर यांना या शासन निर्णयान्वये कार्यालय प्रमुख तसेच आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

७) महाराष्ट्र जमीन महसूल संहिता,१९६६ च्या कलम १३ पोटकलम (३) नुसार तहसिलदार चिमूर, जि. चंद्रपूर व तहसिलदार, नागभिड जि. चंद्रपूर यांना प्रदान करण्यात आलेल्या शक्ती अनुक्रमे अप्पर तहसिलदार, भिसी व अप्पर तहसिलदार, तळोधी बाळापूर यांना त्यांना नेमून दिलेल्या कार्यक्षेत्रापुरत्या प्रदान करण्याबाबत स्वतंत्रपणे अधिसूचना निर्गमित करण्यात येईल.

८) चंद्रपूर जिल्हयातील चिमूर तालुक्यात भिसी व नागभिड तालुक्यात तळोधी बाळापूर येथे अप्पर तहसिलदार कार्यालय स्थापन करण्याकरिता येणारा खर्च "मागणी क्र. सी-१, २०५३, (००) (०९४)- इतर आस्थापना (०१) उपविभागीय आस्थापना (०१) (०५ )आयुक्त, नागपूर संगणक सांकेतांक ( २०५३ ०२०६)" या लेखाशीर्षाखाली दर्शविण्यात यावा व तो सन २०१७-१८ या आर्थिक वर्षात मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा. मंजूर तरतूद अपुरी पडत असल्यास आठमाही अंदाजपत्रक सादर करताना वाढीव तरतूदीची मागणी करावी व ते शक्य नसल्यास पूरक मागणीचा प्रस्ताव सादर करण्यात यावा.

९) सदरहू शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व नवीन पदनिर्मिती, पदांचे पुनरुज्जीवन व पदांचे आढावे इत्यादी प्रस्तावांची सखोल तपासणी करण्यासाठी स्थापन केलेल्या उच्चस्तरीय सचिव समितीच्या चक्रीय पध्दतीने दिनांक ०५.०८.२०१७ रोजी दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक २०१७०८१०११५१३०८८१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्र राज्य राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

K. P. Wadte

Digitally signed by K. P. Wadte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=092f3d18dd73e55dfcdc33acd72708a0290e9758bc4e1500205b182e2d843c82, cn=K. P. Wadte
Date: 2017.08.11 12:58:07 +05'30'

**(कि.पां. वडते)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यापालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई-४०००३५.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अप्पर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
३. मा.मंत्री / मा. राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
४. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
५. अप्पर मुख्य सचिव (रवका), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
६. अप्पर मुख्य सचिव (गृह), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
७. अप्पर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
८. अप्पर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
९. अप्पर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
१०.अप्पर मुख्य सचिव (व्यय), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
११.मुख्य निवडणूक अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
१२.विभागीय आयुक्त, नागपूर
१३.जिल्हाधिकारी, चंद्रपूर
१४.उपविभागीय अधिकारी, चिमूर/ ब्रम्हपूरी जिल्हा चंद्रपूर
१५.तहसिलदार, चिमूर/ नागभिड जिल्हा चंद्रपूर
१६.अप्पर तहसिलदार, भिसी,ता. चिमूर व तळोधी बाळापूर,ता. नागभिड जि.चंद्रपूर
१७.जिल्हा कोषागार अधिकारी, चंद्रपूर
१८. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरिक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर
१९.कार्यासन अधिकारी, महसूल व वन विभाग ( कार्यासन ई-३/ई-८/ई-९/ई-१०/ब-१)
२०.वित्त विभाग ( का. विसू-१/ अर्थसंकल्प -६/ व्यय-९/ आ.पु.क.), मंत्रालय मुंबई
२१.महसूल व वन विभागातील सर्व कार्यासने
२२.निवड नस्ती-कार्यासन म-१०